जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम सन २०२३-२४ अंतर्गत भारतरत्न डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेंतर्गत निधी वितरण. (मागणी क्र.टी-९)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०३/कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-०७ जुलै, २०२३.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थस-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) आदिवासी विकास विभाग, शा.नि.क्र.बियुडी-२०२२/प्र.क्र.०३/का-६ दि.१०.०४.२०२३, दि.०४.०५.२०२३ व दि.६.०६.२०२३.
३) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र.आविवि-०४२३/प्र.क्र.८३/का-०८.

**प्रस्तावना-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२३" यास विधानमंडळाने मंजुरी दिलेली असुन महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागामार्फत संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकास अनुसरून अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ०१-वेतन या बाबीकरीता अर्थसंकल्पीत तरतुदीच्या ३०% तर इतर बाबींकरीता २०% इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर उपलब्ध निधी संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात आला आहे.

जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या "भारतरत्न डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजना" या योजनेंतर्गत आदिवासी भागातील कुपोषण व बालमृत्यू रोखण्याच्या अनुषंगाने आदिवासी महिला व बालकांना परिपुर्ण उष्मांकाचा आहार देण्यात येत आहे. या योजनेचे महत्व व संवेदनशिलता तसेच वित्त विभागाकडून वितरणासाठी उपलब्ध निधी विचारात घेऊन योजनेकरीता सन २०२३-२४ या वर्षातील अर्थसंकल्पित तरतूद १००% मर्यादेत उपलब्ध करून देण्यासंदर्भात संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीवर वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. या प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाने या योजनेकरीता अर्थसंकल्पित तरतूदीच्या ५० % मर्यादेतील तरतूद वितरणासाठी उपलब्ध करून दिलेली आहे. या अनुषंगाने वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधी वितरण मर्यादेत यापुर्वी वितरीत निधी विचारात घेऊन उर्वरीत ३०% वितरणासाठी उपलब्ध निधी संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम सन २०२३-२४ अंतर्गत मागणी क्रमांक टी-९ मधील भारतरत्न डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम **अमृत आहार** योजना (TX२९०००४)या योजनेकरीता

अर्थसंकल्पित तरतूदींच्या स्तंभ-५ प्रमाणे ३०% निधी संबंधीत नियंत्रक अधिकारी तथा जिल्हाधिकारी यांना वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. वित्त विभागाच्या वाचा येथील शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांच्या धर्तीवर कार्यक्रम खर्चाकरीता आर्थिक वर्षाच्या पहिल्या नऊमाहीसाठी (माहे डिसेंबर,२०२३ अखेर) जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेंतर्गत ७० टक्के निधी उपलब्ध करून देण्यात येणार असल्याने त्या अनुषंगाने निधीच्या विनियोगाचे नियोजन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करून दिलेल्या मर्यादेत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०३१८२७३१७२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.07.10 11:59:18 +05'30'

**(किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई.

६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
८. सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास समिती.
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. निवड नस्ती (का-६).

**शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,क्र.बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०३/ का.६, दि.०७ जुलै,२०२३ सोबतचे विवरणपत्र**

(रू.हजारात)

| अ.क्र. | जिल्हा | बाब क्र. | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२२-२३ | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली ३०% तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| भारतरत्न डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजना (TX२९०००४) | | | | |
| १ | अमरावती | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १११८७६.०० | ३३५६२.८० |
| २ | अहमदनगर | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ६४१००.०० | १९२३०.०० |
| ३ | गडचिरोली | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २३७६९२.०० | ७१३०७.६० |
| ४ | गोंदिया | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ६२०००.०० | १८६००.०० |
| ५ | चंद्रपूर | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १२७०००.०० | ३८१००.०० |
| ६ | जळगाव | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४५०००.०० | १३५००.०० |
| ७ | ठाणे | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १५००००.०० | ४५०००.०० |
| ८ | धुळे | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १७००००.०० | ५१०००.०० |
| ९ | नंदुरबार | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ५०८३२९.०० | १५२४९८.७० |
| १० | नांदेड | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ५५०००.०० | १६५००.०० |
| ११ | नागपूर | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १९२००.०० | ५७६०.०० |
| १२ | नाशिक | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १६५०००.०० | ४९५००.०० |
| १३ | पालघर | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ३९००००.०० | ११७०००.०० |
| १४ | पुणे | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ३००००.०० | ९०००.०० |
| १५ | यवतमाळ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १०१८९६.०० | ३०५६८.८० |
| १६ | रायगड | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४५०००.०० | १३५००.०० |
| १७ | धाराशिव | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १.०० | ०.३० |
| | **एकूण** | | **२२८२०९४.००** | **६८४६२८.२०** |